शासकीय विभाग /कार्यालये यांना
लागणाऱ्या वस्तुंच्या खरेदी व
फर्निचर दुरुस्तीबाबत.

GR-2002/073/1633/5001-11

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
पुरक शासन निर्णय, क्रमांक:भांखस-२००१/(२९५८)/उद्योग-६,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- 16 OCT 2001

वाचा :- १) शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक:भांखस-१०८८ /(२५१२) /उद्योग-६, दि.२/१/९२.
२) पूरक शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक:भांखस /२००० /(२८२७) /उद्योग-६. दि.८/७/२०००.

**शासन निर्णय:-**

शासकीय विभाग कार्यालये /महामंडळे /मंडले इत्यादिंना लागणाऱ्या वस्तूंच्या खरेदीच्या बाबतीत शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक:भांखस-१०८८ /(२५१२) /उद्योग-६, दिनांक २/१/९२ अन्वये धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. सदरहू शासन निर्णयाच्या परिशिष्ट पाच मधील उपभाग (क) मधील अनुक्रमांक १६ येथे दि.स्किल्ड ब्लाईंडमेन्स इंडस्ट्रियल को.ऑप.प्रोडयुसर्स, सोसायटी लि. १६३ /५११२, कन्नमवार नगर क्र.१, विक्रोळी (पूर्व), मुंबई - ४०० ०८३ या संस्थेकडून खुर्च्या दुरुस्ती /वेतकाम /लाकडी फर्निचर करुन घेण्यासाठी आरक्षण देण्यात आलेले आहे. आता सदरहू संस्थेस "फर्निचर दुरुस्ती" या बाबीसाठीही या शासन निर्णयाद्वारे आरक्षण देण्यात येत आहे. त्यामुळे दि.२/१/१९९२ च्या शासन निर्णयातील उपरोक्त परिशिष्ट ५ मधील उपभाग (क) येथील अनुक्रमांक १६ येथील नोंद खालील प्रमाणे वाचण्यात यावी :

| <u>अनुक्रमांक १६</u> | <u>आरक्षित वस्तू</u> |
|---|---|
| दि स्किलड ब्लाईंडमेन्स इंडस्ट्रियल को.ऑप.प्रोडयुसर्स सोसायटी लि., १६३ /५११२, कन्नमवार नगर क्र.१, विक्रोळी (पूर्व), मुंबई - ४०० ०८३. | खुर्च्या दुरुस्ती /वेतकाम /लाकडी फर्निचर /फर्निचर दुरुस्ती. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि.क.सावे )
कार्यासन अधिकारी.

एच- ७०८ (१२००-१०-०१)